राज्य सरोवर संवर्धन योजनेंतर्गत नगरपरिषद वाशिम, जि. वाशिम येथील नारायणबाबा तलावास निधी वितरित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रासयो-२०२३/प्र.क्र.१६ /आस्थापना-अ**
नवीन प्रशासन भवन, १५ वा मजला, हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २७ मार्च, २०२३.

वाचा :-

१) पर्यावरण विभागाचा शासन निर्णय क्रमांक रासयो-२०१९/प्र.क्र.८०/तां.क.२, दिनांक ०७ मार्च, २०१९.
२) मुख्याधिकारी, वाशिम नगरपरिषद, जि. वाशिम यांचे पत्र क्र.जाक्र.नपवा/कार्या-१७/ २०१३/ २०२२, दि.०८.०९.२०२२ व पत्र क्र.जाक्र.नपवा/कार्या-१७/२०६९/२०२२,दि.१६.०९.२०२२

प्रस्तावना -

राज्य सरोवर संवर्धन योनजेतर्गंत मुख्याधिकारी, वाशिम नगरपरिषद मार्फत सादर नारायणबाबा तलावाच्या संवर्धन प्रस्तावास संदर्भाधीन दिनांक ०७ मार्च, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. उपरोक्त तलावाच्या संवर्धनाच्या अनुषंगाने मंजूर करण्यात आलेली कामे राबविण्यासाठी संदर्भाधीन दिनांक ०७ मार्च, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये रुपये १४०.०० लक्ष इतका निधी वितरित करण्यात आला होता. सदर रकमेचा पूर्णपणे विनियोग झाल्याबाबत संबंधितांनी उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले आहे.

मुख्याधिकारी, वाशिम नगरपरिषद यांच्या दि.१६.०९.२०२२ रोजीच्या पत्रासोबत जोडलेल्या भौतिक प्रगती अहवालानुसार सदर तलाव संवर्धनाचे ५०% काम पूर्ण झालेले आहे. उपरोक्त कागदपत्राच्या आधारे तसेच एकूण खर्चाच्या अनुषंगाने वाशिम नगरपरिषद येथील नारायणबाबा तलावाच्या पर्यावरण संवर्धनासाठी उर्वरित रूपये १४०.०० लक्ष इतक्या निधीपैकी रुपये १३५.०० लक्ष इतका निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

राज्य सरोवर संवर्धन योजनेतंर्गत मुख्याधिकारी, वाशिम नगरपरिषद यांचेमार्फत प्राप्त नारायणबाबा तलावाच्या पर्यावरणीयदृष्ट्या संवर्धन करण्यासाठी संदर्भाधीन दिनांक ०७ मार्च, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये एकूण मंजूर रुपये ३,५०,००,०००/- (अक्षरी रुपये तीन कोटी पन्नास लक्ष फक्त) एवढया निधीमधील राज्य हिस्स्यापोटी एकूण मंजूर रु. २,८०,००,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी ऐंशी लक्ष फक्त) इतक्या रक्कमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली होती. मंजूर रकमेपैकी आतापर्यत रुपये १,४०,००,०००/-(रुपये एक कोटी चाळीस लक्ष फक्त) इतका निधी वितरित करण्यात आलेला आहे. आता या शासन निर्णयाद्वारे वाशिम नगरपरिषद येथील नारायणबाबा तलाव संवर्धनाची उर्वरित कामे राबविण्यासाठी पुढील हप्ता म्हणून रक्कम रूपये १,३५,००,०००/- (रु. एक कोटी पस्तीस लक्ष फक्त) इतका निधी वितरित करण्यास तसेच सदर रक्कम खर्च करण्यास मुख्याधिकारी, वाशिम नगरपरिषद यांना मान्यता देण्यात येत आहे.

२. मुख्याधिकारी, वाशिम नगरपरिषद यांनी सदर निधी मंजूर कामांसाठी खर्ची करून अंतिम उपयोगिता प्रमाणपत्र व प्रकल्प पूर्णत्वाचा अहवाल पर्यावरण व वातावरणीय बदल विभागास सादर करण्याची दक्षता घ्यावी. तलाव संवर्धनाचे काम पूर्ण झाल्याबाबत कार्यपूर्ती अहवाल विभागास प्राप्त झाल्यावर उर्वरित रु. ५,००,०००/- इतका निधी वितरित करण्यात येईल.

३. मुख्याधिकारी, वाशिम नगरपरिषद यांना अदा करावयाची रूपये १,३५,००,०००/- (रु. एक कोटी पस्तीस लक्ष फक्त) एवढी रक्कम अधिदान व लेखाधिकारी यांच्यामार्फत कोषागारातून वित्त विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र.संकीर्ण २०२०/प्र.क्र.६/२०/कोषा-प्रशा ५,दि १२.११.२०२१ अन्वये ई-कुबेर प्रणालीद्वारे थेट मुख्याधिकारी, वाशिम नगरपरिषद यांचे बँक खाते- Rajya Sarover SaverdhanYojana RSSY, खाते क्र.९१९०१००७४७४५८०५ मध्ये जमा करावे.

४. सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च हा मागणी क्र. यू-४, ३४३५ परिस्थितिकी व पर्यावरण ०४, प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण, १०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना -राज्य योजनांतर्गत योजना, (०२),पर्यावरण प्रतिबंध, (०२) (०७), राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजना (३४३५ ०१८२), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या मुख्य- लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ या वर्षासाठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली वर्गीकृत करण्यात यावा.

५. प्रस्तूत शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२२/प्रक्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे. तसेच प्रमाणित करण्यात येते की, दिनांक ०४.०४.२०२२ रोजीच्या शासन निर्णयातील परिशिष्टातील अनु.क्र. २ व ९ मधील अटींची पुर्तता होत आहे, तसेच वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२२/ प्रक्र.४३/ अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२ व दि. ०८ फेब्रुवारी, २०२३ रोजीच्या शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार वितरित करण्यात येत आहे.

I) वित्त विभागाच्या परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२२/प्रक्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२ च्या परिशिष्टातील अनुक्रंमांक ९ मधील ३१ वेतनेतर सहायक अनुदाने या बाबीखालील खर्च करण्यास विभागाला अधिकार प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील नमूद अटींची पूर्तता करण्यात आली आहे.

II) वित्त विभागाच्या परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२२/प्रक्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२ च्या परिशिष्टातील अनुक्रमांक १,३,४,५,६,७ व ८ या प्रकरणी लागू नाही. तसेच सदर परिशिष्टातील अनुक्रमांक ४ बाबत नमूद करण्यात येते की ही योजना केंद्र पुरस्कृत बाह्य सहाय्यित योजना नाही.

III) वित्त विभागाच्या परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२२/प्रक्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२ च्या परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक २ च्या अनुषंगाने नमूद करण्यात येत की, सदर योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये कसलाही बदल करण्यात आलेला नाही. तसेच परिशिष्टातील अ.क्र.९ संदर्भातील तपासणी सूचीमधील अनुक्रमांक १,२,३ व ४ मध्ये नमूद करण्यात आलेल्या अटींची पूर्तता होत आहे. तसेच सदर अनुक्रमांक ९ संदर्भातील तपासणी सूचीमधील अनुक्रमांक ५ ते १० या प्रकरणी लागू नाही.

६. या शिवाय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा-५, दिनांक १०.०५.२०१६ अन्वये परिच्छेद क्र.४ मधील खालील बाबींची पूर्तता होत आहे.

१) विभागास प्रदान वित्तीय अधिकाराबाबत वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र अर्थस २०१८/ प्र.क्र.६९/अर्थ-३ दिनांक ०२.०४.२०१८ मधील परिच्छेद क्र.६ (अ) नुसार रु.५ कोटी पर्यंतच्या अनावर्ती योजनेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना आहेत.

२) नारायणबाबा तलावाच्या संवर्धनासाठी रुपये ३,५०,००,०००/- (अक्षरी रुपये तीन कोटी पन्नास लक्ष फक्त) एवढया मंजूर निधीमधील राज्य हिस्स्यापोटी एकूण मंजूर रुपये २,४०,००,०००/- (अक्षरी रुपये दोन

कोटी चाळीस लक्ष फक्त) पैकी रूपये १,३५,००,०००/-(रु. एक कोटी पस्तीस लक्ष फक्त) इतका निधी पुढील हप्त्यापोटी प्रस्तुत शासन निर्णयाव्दारे वितरित करण्यात येत आहे.

३) सदर तलावास मागील तीन महिन्यात कोणताही निधी मंजूर करण्यात आलेला नाही. मुख्याधिकारी, वाशिम नगरपरिषद यांना वितरीत करण्यात आलेल्या अनुदानाचा १०० टक्के विनियोग पूर्ण केला असल्याबाबत उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले आहे.

४) "मागणी क्र.यु-४, ३४३५-परिस्थितीकी व पर्यावरण, ०४, प्रदुषण प्रतिबंध व नियंत्रण, १०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना, (०२) पर्यावरण प्रतिबंध (०२) (०७) राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजना (३४३५ ०१८२) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)"या मुख्य लेखाशिर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

५) मुख्याधिकारी, वाशिम नगरपरिषद यांच्याकडून पर्यावरण व वातावरणीय बदल विभागास कोणतेही येणे बाकी नाही.

६) तसेच उपरोक्त शासन निर्णयाच्या "अ" मधील परिच्छेदातील ६,७,८,९ या बाबी लागू नाहीत.

७. प्रस्तूत शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२२/प्रक्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३२८१६३४०७२८०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SURYAKANT
KISAN NIKAM

Digitally signed by SURYAKANT KISAN NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT,
2.5.4.20=3978ce8e745a91e0561f6f9473df7e92873ee7ac8c2f7c49ac520e61061ddded, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=3A94A1F658A34D45CA2859DBC88DFB40760079B8946087EF0FB8BC7CD7314C27, cn=SURYAKANT KISAN NIKAM
Date: 2023.03.28 16:38:39 +05'30'

**( सु. कि. निकम ) ,**
**सह सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राज भवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री (पर्यावरण व वातावरणीय बदल ) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (पर्यावरण व वातावरणीय बदल), मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सह सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल, मंत्रालय, मुंबई.
८. मुख्याधिकारी, वाशिम नगरपरिषद, जि. वाशिम,
९. महालेखापाल (लेखापरिक्षा) १. महाराष्ट्र मुंबई-४०००२०
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई- ४०००२०
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर

१२. महालेखापाल (लेखापरिक्षा) २. महाराष्ट्र, नागपूर
१३. अधिदान व लेखाधिकारी, वांद्रे (पूर्व) मुंबई-४०००५१.
१४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१५. निवासी लेखाधिकारी, मुंबई
१६. संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई
१७. मुख्यलेखा परिक्षक, स्थानिक निधीलेखा, कोकण भवन, मुंबई
१८. वित्त विभाग (कार्यासन क्रमांक व्यय-१६/अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.
१९. नियोजन विभाग, कार्यासन क्र.१४७२, मंत्रालय, मंबई.
२०. रोखशाखा, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१. निवडनस्ती.